**महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाने "कार्यसंस्कृती अभियान"व "भ्रष्टाचार निर्मुलन" संदर्भात आयोजित केल्या जाणा-या कार्यशाळेला उपस्थीत राहण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०११/प्र.क्र.९५/१८ (र. व का.),
मंत्रालय, मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर,२०११

**परिपत्रक**

राज्य शासनाचे अधिकारी/कर्मचारी जनतेचे सेवक आहेत. जनतेची कामे विनासायास, व तत्परतेने करणे हे शासकीय अधिकारी कर्मचा-याचे कर्तव्य आहे, ही भावना सर्व शासकीय अधिकारी/ कर्मचा-यांमध्ये बिंबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य राजपत्रीत अधिकारी महासंघाकडून "कार्यसंस्कृति अभियान" व " भ्रष्टाचार निर्मुलन" संदर्भात अर्ध्या दिवसाची कार्यशाळा सर्व जिल्हयांमध्ये आयोजित करण्याचा महाराष्ट्र राज्य राजपत्रीत अधिकारी महासंघाचा संकल्प आहे.

२. महासंघाच्या या कार्यशाळेत उपस्थित राहण्यासाठी/सहभागी होण्यासाठी संबंधित जिल्हयाच्या शासकीय कार्यालयातील ज्या अधिकाऱ्यांनी या कार्यशाळेसाठी महासंघाच्या कार्यालयात नोंदणी केलेली असेल, असे अधिकारी यांना शासकीय कामकाजावर विपरीत परिणाम न होण्याच्या अटीवर कार्यशाळेच्या दिवशी दुपारी १.३० नंतर कार्यालय सोडण्यास परवानगी देण्याच्या सूचना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत. मंत्रालयीन विभागांनी सर्व संबंधित विभाग प्रमुखांच्या निदर्शनास वरील सुचना आणून द्याव्यात.

सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१११०१९१२१५४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

**( स.मा.साबळे )**
**उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,

कृ.मा.प.

मा.सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक,
मा.मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सरचिटणीस, महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ, नवीन प्रशासन भवन,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
निवडनस्ती (कार्या.१८)